शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजना
दि. १५ जुलै, २००७ ते १४ ऑगस्ट,२००७ पर्यंत
पुढे चालू ठेवण्याबाबत

साकताक न.202112201710018401

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक पीएआयएस १२०७८/५४९/प्र.क्र.२५६/०७/११-अे**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२**
**दिनांक १२ जुलै, २००७**

**वाचा :-१)** शासन निर्णय कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्र.एनएआयएस१२०४/प्र.क्र.१६६/११-अे, दिनांक १९ ऑगस्ट,२००४
२) शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्र.एनएआयएस१२०४/प्र.क्र.१६६/११-अे, दिनांक ५ जानेवारी, २००५
३) शासन निर्णय, कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्र.एनएआयएस १२०४/प्र.क्र.१६६/११-अे, दिनांक ३१ मार्च,२००५
४) शासन पत्र क्रमांक पीआयएस १२०५/प्र.क्र.३१०/११-अे, दिनांक २० एप्रिल,२००६
५) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.शेव्यअवियो-सां-८/१९६/२००६,दिनांक २७ एप्रिल,२००६
६) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.शेव्यअवियो-सां-८/२७५/२००६, दिनांक १५ जून ,२००६
७) शासन निर्णय क्र. पीएआयएस १२०५/प्र.क्र.३१०/११-अे,दिनांक ७ जुलै,२००६

**प्रस्तावना :-**

शेती व्यवसाय करतांना होणारे रस्त्यावरील अपघात तसेच वीज पडणे, विजेचा शॉक बसणे, पूर सर्पदंश, विंचूदंश व वाहन अपघात तसेच कोणत्याही नैसर्गिक आपत्तीमुळे होणारे अथवा अन्य कोणतेही अपघात यामुळे बऱ्याच शेतकऱ्यांचा मृत्यू ओढवतो किंवा काहींना अपंगत्व येते. घरातील कर्त्या व्यक्तिस झालेल्या सदर अपघातामुळे कुटुंबाचे उत्पन्नाचे साधन बंद होवून अडचणीची परिस्थिती निर्माण होत असल्याने अशा अपघातग्रस्त शेतकऱ्यांस/ त्यांच्या कुटुंबास आर्थिक लाभ देण्याकरिता शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजना शासनाने क्र. १ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित केलेली आहे.

२. सदर योजनेचे कल्याणकारी स्वरुप पहाता ही योजना पुढे सन २००७-०८ मध्ये चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. सन २००६-०७ प्रमाणे सन २००७-०८ सालासाठी शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजनेस दि.१५ जुलै, ते १४ ऑगस्ट, २००७ या एक महिन्याच्या कालावधीसाठी मुदतवाढ देवून सदर योजना पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे. सदर वाढीव कालावधीसाठी ओरिएंटलचा विमा हप्ता सल्लागार कंपनी, विमा कंपन्या, योजनेबाबतच्या इतर अटी व शर्तींमध्ये कोणताही बदल होणार नाही. एक महिन्यासाठी देय विमा हप्ता संपूर्ण वर्षाच्या १/१२ या प्रमाणात देय राहील. या दरम्यान योजनेबाबत पुढील आदेश शासनाकडून अंतीम करण्यात येतील.

३. चालू वित्तीय वर्षासाठी (०७-०८) (अ) नॅशनल इन्शुरन्स कंपनी या विमा कंपनीकडे शेतकऱ्यांना विमा उतरविण्यासाठी विमा हप्ता व त्यावरील सेवा कर यासाठी रुपये ३८,२०,२४० /- (अक्षरी अडतीस लाख वीस हजार दोनशे चाळीस फक्त) इतकी तरतूद या व्दारे मंजूर करुन या आदेशान्वये वितरीत करण्यात येत आहे. (ब) रिलाएन्स इन्शुरन्स कंपनी या विमा कंपनीकडे शेतकऱ्यांना विमा उतरविण्यासाठी विमा हप्ता व त्यावरील सेवा कर यासाठी रुपये २१,३४,८४०/- (अक्षरी एकवीस लाख चौत्तीस हजार आठशे चाळीस फक्त) अशी एकूण रु. ५९,५५,०८०/- (अक्षरी एकोणसाठ लाख पंचावन्न हजार ऐंशी फक्त) इतकी रक्कम या आदेशाव्दारे मंजूर करुन वितरीत करण्यात येत आहे.

४. या वरील खर्च मागणी क्र.डी ४, २४०१- पिक संवर्धन, ११०-पिक विमा राज्य योजनेंतर्गत योजना, (००)(०६) शेतकऱ्यांसाठी व्यक्तिगत अपघात विमा योजना (२४०१ ४४२७-७) - ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावे.

५. उपरोक्त प्रयोजनासाठी खर्च करण्यास सहाय्यक संचालक, लेखा, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर रक्कम पुणे कोषागारातून काढून रेखांकित धनादेशाव्दारे नॅशनल इन्शुरन्स विमा कंपनी व रिलायन्स जनरल इन्शुरन्स कंपमी या विमा कंपन्यांना अदा करावी.

६. हे आदेश नियोजन तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे १२३/०७/का-१४३१, दिनांक ६/७/२००७ व क्रमांक २०१/व्यय-१, दिनांक १०/७/२००७ नुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,**

(शु.अ.गोसावी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

प्रति,

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव
२) प्रधान सचिव, मा. मुख्यमंत्री सचिवालय,
३) सचिव, मा. उपमुख्यमंत्री कार्यालय,
४) खाजगी सचिव, मा.मंत्री कृषि व जलसंधारण
५( खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, कृषि
६) खाजगी सचिव, मा.मंत्री व राज्यमंत्री, फलोत्पादन,
७) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८) मा. मुख्यसचिव यांचे स्वीय सहाय्यक
९) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) प्रधान सचिव ( महसूल व वन विभाग) मंत्रालय, मुंबई

१२) प्रधान सचिव, गृह विभाग,(अ. व सु.)मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिय,(कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) सचिव, (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग,मंत्राल,मुंबई
१५)( मंत्रालयातील इतर सर्व विभाग, मुंबई
१६) सचिव, कृषि मंत्राल, भारत सरकार,(कृषि व सहकार विभाग,कृषि भवन, नवी दिल्ली
१७) सचिव, वित्त मंत्रालय, भारत सरकार, (वित्त विभाग),(विमा),नवी दिल्ली
१८) आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१९) अध्यक्ष, कब्राल इन्शुरन्स सर्व्हिसेस प्रा.लि.मित्तल टॉवर्स, ११८ बी विंग,११वा मजला, नरीमन पॉईंट, मुंबई ४०० ०२१
२०) व्यवस्थापकीय संचालक, नॅशनल इन्शुरन्स कंपनी लि. स्टर्लींग सिनेमा बिल्डींग, २रा मजला, ६५ मर्झबान रोड, डी.ओ.१४ फोर्ट, मुंबई ४०० ००१
२१) व्यवस्थापक, रिलायन्स जनरल इन्शुरन्स कंपनी लि. ११, रिलायन्स सेंटर, वालचंद हिराचंद मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई ४०० ०३८
२२) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२३) सर्व संचालक/सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
२४) अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२५) महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य, सहकारी बँक, ९ नगीनदास रोड, मुंबई-२३
२६) महालेखापाल (लेखा परिक्षा, लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२७) महालेखापाल (लेखा परिक्षा, लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
२८) विमा संचालक, म्हाडा ईमारत, १ला मजला, बांद्रा(पुर्व),मुंबई
२९) संचालक, माहिती आणि प्रसिध्दी (प्रसिध्दीसाठी) मंत्रालय, मुंबई
३०) मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
३१) सर्व जिल्हाधिकारी,
३२) जिल्हा कोषागारे कार्यालय, पुणे
३३) सर्व विभागीय कृषि सह संचालक, महाराष्ट्र राज्य
३४) सर्व अधिक्षक कृषि अधिकारी/कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
३५) सर्व सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव /कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, (कृषि उप विभाग), मंत्रालय, मुंबई
३६) सर्व तहसिलदार
३८) निवड नस्ती, ११-अे